महाराष्ट्र राज्यातील नागरी व शहरी क्षेत्राच्या लगत वाहणा-या अधिसूचित नद्यांची वहन क्षमता पुन:स्थापित करण्याचे धोरण व कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक:- नदिगा २०२२/ प्र.क्र. (२९९/२०२२) सिं.व्य.(म),**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २५ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ मधील कलम १९,२० व २१ मधील तरतूदीनुसार अधिसुचीत नदी, ओढा किंवा जलनि:स्सारणाचा नैसर्गिक मार्ग यामध्ये होणारे अडथळे दूर करण्याचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत.

महाराष्ट्र राज्यामध्ये पावसाळयात व बारमाही वाहणाऱ्या प्रमुख नद्या व उपनद्या असून, दरवर्षी पावसाळयात या नद्यांना लहान मोठया प्रमाणात पूर येत असतो. या पूरामुळे आजू-बाजूच्या नागरी व शहरी भागांमध्ये पाणी पसरुन दरवर्षी आर्थिक नुकसान होत असते. या नुकसानीचे पंचनामे करुन शासनाच्या मदत व पुनर्वसन विभागामार्फत बाधितांना आर्थिक मदत देखील द्यावी लागते. यामुळे शासनाचे दरवर्षी दोन्ही प्रकारे महसुली नुकसान होत असते.

एकंदरीत जागतिक तापमान वाढीमुळे व पर्यावरणीय बदलामुळे सर्वच ठिकाणी पर्जन्याचे प्रमाण विखुरलेल्या स्वरुपात न होता, केंद्रीत स्वरुपात व कमी कालावधीत ढगफुटी सदृश्य पाऊस पडण्याचे प्रमाण वाढले आहे. या मोठया प्रमाणावर होणाऱ्या पर्जन्यवृष्टीमुळे शहरी भागात पूर परिस्थिती निर्माण होवून, जिवीत व वित्तहानी होण्याचे प्रकार वाढले आहेत. याप्रमाणेच सन २००५, २००६, २०११, २०१९ व २०२२ या वर्षांमध्ये विविध शहरांमध्ये पूर परिस्थिती निर्माण झाली होती.

पावसाळयात पूराच्या पाण्याबरोबर आजू-बाजूच्या डोंगर भागातील भुस्खलनामुळे होणारी माती, दगड, गोटे, रेती असे अनेक पदार्थ वाहून येतात व हळूहळू नदीच्या सखल भागामध्ये जमा होवून अशा गाळाची बेटे तयार होतात. त्यामुळे नदीच्या वहन क्षमतेमध्ये घट होवून, पूराच्या पाण्याचा निचरा होण्यासाठी अडथळे निर्माण होतात. तसेच नद्यांच्या पाणलोट क्षेत्रात होणारे शहरीकरण, बांधकामे, वृक्षतोड, रस्ते व रेल्वे वाहतूक इत्यादीसाठी केलेला भराव व खोदकामे यामुळे आजूबाजूचा गाळ पाण्यामध्ये वाहत येवून त्यामुळे नदी पात्र अरुंद व उथळ होत असते. नदी पात्रात अशाप्रकारे तयार झालेले अडथळे काढणेबाबत शासनाचे निश्चित असे कोणतेही धोरण नसल्याने, प्रमुख नद्यांच्या पात्रातील अडथळे दूर करण्यात आलेले नाहीत. त्यामुळे बहुतांश नद्यांची वहन क्षमता ही त्यांच्या मुळ क्षमतेपेक्षा कमी झालेली असून त्यामुळे नद्यांच्या शेजारील शहरी भागांमध्ये पर्जन्यमानामुळे पाणी पसरुन पूरसदृश्य परिस्थिती निर्माण होते.

राज्यातील अधिसूचीत नद्या व त्यावर बांधलेले पाटबंधारे प्रकल्प हे जलसंपदा विभागांतर्गत ५ विविध पाटबंधारे विकास महामंडळांच्या अखत्यारित आहेत. पाटबंधारे विकास महामंडळ कायद्यातील तरतूदी नुसार पाटबंधारे विकास महामंडळांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील नद्यांचे व

प्रकल्पांचे पूरनियंत्रण व लाभक्षेत्र विकासाच्या योजनांची आखणी, बांधकामे व सिंचन व्यवस्थापन करणे अपेक्षित आहे.

सन २०१९ साली कृष्णा व भिमा खोऱ्यात उद्भवलेल्या पूर परिस्थितीची कारणे शोधणे व भविष्यकालीन उपाययोजना सुचविण्यासाठी शासन निर्णय २३ ऑगस्ट, २०१९ अन्वये श्री. नंदकुमार वडनेरे निवृत्त प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करणेत आली होती. या समितीने केलेल्या एकूण १८ शिफारशींपैकी शासनाने दिनांक १२ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयाद्वारे ज्या शिफारशी स्विकृत केल्या आहेत, त्यामधील शिफारस क्र. ८ “नदी व मोठे नाले रुंदीकरण करणे, खोलीकरण करणे व त्यातील गाळ काढणे, नदीला पूर संरक्षक बांध घालणे, नदी सरळीकरण कामे” ही शिफारस अंशत: स्विकृत केली असून, त्याची कार्यवाही महसूल विभाग, नगर विकास विभाग, जलसंपदा विभाग यांच्या समन्वयाने करण्याचे शासन निर्णयामध्ये नमूद आहे.

दिनांक २२ व २३ जुलै, २०२१ रोजी रत्नागिरी जिल्हयातील चिपळूण शहराला वाशिष्ठी नदीला आलेल्या पुरामुळे सलग दोन दिवस पूर परिस्थितीशी सामना करावा लागला. यावर उपाययोजना म्हणून स्थानिक लोक प्रतिनिधी व चिपळूण बचाव समिती यांची आग्रही मागणी व आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र शासनाच्या जलसंपदा विभागाने वाशिष्ठी नदीचा गाळ काढण्याचे काम दिनांक ७ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेमार्फत हाती घेतले होते व सन २०२२ च्या पावसाळयाची सुरुवात होण्यापर्यंत बहुतांश काम पूर्ण केले होते. त्यामुळे सन २०२२ च्या पावसाळयामध्ये चिपळूण शहराला पूर परिस्थितीचा सामना करावा लागला नाही.

शासन निर्णय क्रमांक पूसंभि -२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिं.व्य.(म), दिनांक ३१ ऑगस्ट, २०१९ नुसार जलसंपदा विभागाने पुरसंरक्षक कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबतचे सुधारित धोरण निश्चित केले आहे. यामध्ये प्रामुख्याने नदी/नाला काठावर माती भराव करणे, दगडी/ संधानक अस्तरीकरण करणे, संधानकातील आधार भिंत/Retaining wall बांधणे, नदी/नाला प्रवाहाला उचित दिशा देणे इत्यादी कामांचा समावेश आहे.

त्याचबरोबरीने पूरसंरक्षणासाठी काही नद्या व उपनद्या यांच्या वहनमार्गातील अडथळे दूर करणे देखील आवश्यक झाले असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. या कामाचा उद्देश साठलेल्या गाळामुळे / बेटांमुळे नदीच्या विसर्गाला होणारा अडथळा दूर करणे व नदीची विसर्ग क्षमता वाढविणे हा आहे, जेणेकरुन येणारा पूर हा नदीचा काठ सोडून आजू-बाजूच्या नागरी वस्तीच्या परिसरात पसरु शकणार नाही.

नदी,नाल्यांच्या पूर विसर्गामुळे घरे, रस्ते, लोकवस्ती, कारखाने, उद्योग, शेत जमीनी इत्यादी पाण्याखाली बुडतात. नदीच्या कमी वहन क्षमतेमुळे पुराचा कालावधीही वाढतो. त्यामुळे होणारी वित्त व जिवित हानी टाळण्यासाठी पूर प्रतिबंधक योजना म्हणून नद्यांच्या वहन मार्गातील अडथळे दूर करण्याची योजना राबविणे क्रमप्राप्त झालेले आहे.

मध्यंतरीच्या काळात राष्ट्रीय हरित लवाद वेस्टर्न झोन, पुणे बेंच यांनी M.A. ७८/२०१८ (WZ) in Appeal No.२५/२०१४ (WZ) सारंग यादवाडकर विरुध्द महाराष्ट्र शासन या न्यायालयीन

प्रकरणात असे आदेश पारित केले होते की, पूर प्रवण क्षेत्रातील शहरी/ नागरी व इतर भागात निळी पूररेषा आखण्यात यावी.

सदर निर्णयाच्या अनुषंगाने आढावा घेतला असता, राज्यातील प्रमुख नद्यांच्या लांबीपैकी शहरी/नागरी वसाहतीतून प्रवाहीत होणा-या एकूण १६४८.८३ कि.मी. लांबीमध्ये लाल व निळया पूर रेषांची आखणी करण्यात आली आहे व त्याची माहिती जलसंपदा विभागाच्या संकेतस्थळावर दर्शविण्यात आली आहे. त्यामुळे सदर माहितीच्या आधारे शहरी/नागरी वसाहती असल्याने या ठिकाणी जिवित/वित्त हानी मोठया प्रमाणात होण्याची शक्यता विचारात घेता, या धोरणांतर्गत याच १६४८.८३ कि.मी. पैकी ज्या लांबीमध्ये गाळ साठून नद्यांच्या प्रवाहामध्ये मोठया प्रमाणात अडथळे निर्माण झालेले आहेत अशा भागांमधून प्रथम टप्प्यात गाळ काढण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

उपरोक्त पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील प्रमुख शहरालगत वाहणाऱ्या व त्यांचेमुळे वारंवार पूर परिस्थिती उद्भवणाऱ्या नद्यांमधील अडथळे दूर करण्याचे धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने दिनांक २८.०६.२०२३ रोजी झालेल्या मा. मंत्रीमंडळ बैठकीत याविषयी सर्वांगीण चर्चा व विचारविनिमय करुन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## <u>शासन निर्णय:-</u>

महाराष्ट्र राज्याच्या पूरप्रवण क्षेत्रातील बाधित शहरातून वाहणा-या नद्यांमधील पुराचा प्रभाव कमी करण्याच्या दृष्टीने तसेच नद्यांची वहन क्षमता पुन:स्थापित करण्याच्या दृष्टीने नदी पात्रातील गाळ व राडारोडा तसेच नदी पात्रात गाळामुळे निर्माण झालेली बेटे, नदीपात्रातील अडथळे इत्यादी (इथून पुढे या सर्वांना " वहन मार्गातील अडथळा" असे संबोधण्यात येत आहे) निष्कासित करण्याची कार्यवाही जलसंपदा विभागाच्या अखत्यारीतील यांत्रिकी संघटनेमार्फत/ अशासकीय संस्थेच्या मदतीने (NGO)/ खाजगी कंपन्यांकडून CSR फंडातून करण्यात यावी. त्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे:-

### <u>प्रशासकीय मान्यतेची कार्यपध्दती</u> :-

१) " वहन मार्गातील अडथळा" काढण्याची कार्यवाही जलसंपदा विभागाने अधिसूचीत केलेल्या सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विविध नद्यांमधील एकूण १६४८.८३ कि.मी. लांबीपैकी ज्या लांबीमध्ये गाळ साठून नद्यांच्या प्रवाहामध्ये मोठया प्रमाणात अडथळे निर्माण झालेले आहेत, त्या लांबीमध्येच प्रथम टप्प्यांत करण्यात यावी.

२) गाळ काढावयाच्या अधिसूचीत असलेल्या नद्या व पूरप्रवण क्षेत्रामध्ये सर्वप्रथम लाल व निळया पूररेषांचे सर्व्हेक्षण करुन पूररेषा नकाशांना मुख्य अभियंता स्तरावर मान्यता घेऊन अशा पुररेषा विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द कराव्यात व त्यानुसार क्षेत्रिय स्तरावर पूर रेषांची आखणी करण्यात आली असल्याची खात्री जलसंपदा विभागाच्या स्थानिक अधिका-यांनी करावी.

३) परिशिष्ट-१ मध्ये दर्शविण्यात आलेल्या नद्यांच्या लांबीपैकी ज्या लांबीमध्ये गाळ काढावयाचा आहे त्या लांबीमधील नदी पात्राचे सर्वेक्षण जलसंपदा विभागाच्या कार्यकारी अभियंता यांनी करावे.

४) वहन मार्गातील अडथळा दूर करण्याच्या कामांकरीता संबंधित जिल्ह्यातील जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठित करावी :-

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजलसर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| ३. | उप प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| ४. | जिल्हा खनिकर्म अधिकारी | सदस्य |
| ५. | जिल्हा जलसंधारण अधिकारी,मृद व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ६. | आयुक्त/उपायुक्त -- स्थानिक महानगरपालिका/ मुख्याधिकारी- नगरपालिका | सदस्य |
| ७. | कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी विभाग, जलसंपदा विभाग | सदस्य |
| ८. | महसूल यंत्रणेकडील उपविभागीय अधिकारी/ तहसिलदार | सदस्य |
| ९. | उप वनसंरक्षक अधिकारी | सदस्य |
| १०. | आय.आय.टी किंवा शासकीय इंजिनिअरिंग कॉलेज येथील स्थापत्य विभागातील एक प्राध्यापक. | सदस्य |
| ११. | अशासकीय संस्थेचे दोन सभासद | सदस्य |
| १२. | कार्यकारी अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग | सदस्य सचिव |

**<u>समितीची कार्यकक्षा</u> :-**

i. समितीच्या सदस्यांनी नदीपात्राची प्रत्यक्ष पाहणी करुन कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग यांनी केलेल्या सर्वेक्षणानुसार नदी पात्रातील गाळ साठलेल्या भागाची लांबी व गाळाचे परिमाण तसेच निष्कासित केलेल्या गाळाची विल्हेवाट कोणत्या जागेवर करावी याबाबतचा अहवाल समितीचे अध्यक्ष यांच्याकडे सादर करावा.

ii. पूराच्या तीव्रतेचा विचार करुन गाळ काढण्याच्या कामाचे प्राधान्यक्रम निश्चित करणे.

iii. नदीपात्रातील गाळ साठलेल्या भागाची लांबी व गाळाचे परिमाण निश्चित करणे.

iv. निष्कासित गाळाची विल्हेवाट करावयाचे ठिकाण निश्चित करणे.

v. सदर उपाययोजनेमुळे पुर परिस्थिती निवळण्यासाठी किती मदत होणार आहे याबाबत सर्वकष अभ्यास करणे.

vi. जिल्हाधिकारी यांनी या अहवालाच्या अनुषंगाने आपत्कालीन व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील कलम (३०) चा वापर करुन नदीतील गाळ काढण्याच्या कामास ठरावाद्वारे मान्यता द्यावी.

vii. अशासकीय संस्था (NGOs) यांची सूचिबध्द यादी (Empanelled List) धर्मदाय आयुक्त (Charity Commissioner) यांच्या सहकार्याने निश्चित करावी.

viii. जलसंपदा विभागाची यांत्रिकी संघटना, अशासकीय संस्था (NGO) तसेच खाजगी कंपन्यांकडून (CSR) मार्फत करण्यात आलेल्या कामांचे मुल्यमापन / मोजमाप यावर संनियंत्रण करणे .

ix. याव्यतिरिक्त या शासन निर्णयातील मुद्या क्रमांक इ(२) मध्ये नमूद सर्व बाबींचे संनियंत्रण सदर समितीने करावे.

५) नदी पात्रातील गाळ निष्कासित करण्याचे परिमाण निश्चित झाल्यानंतर गाळ काढण्यासाठी जलसंपदा विभागांतर्गत प्रचलित पध्दतीनुसार अंदाजपत्रक तयार करण्याची कार्यवाही जलसंपदा विभागाच्या क्षेत्रिय कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांनी करावी.

६) या अंदाजपत्रकासह नदी पात्रातील अडथळे काढण्यासाठीचा प्रस्ताव तयार करुन त्याची तपासणी शासन निर्णय पुसंभि २०१९/प्र.क्र. (११५/२०१९)/सिं.व्य.(म), दिनांक ३१.०८.२०१९ मधील तरतूदीनुसार करुन तो प्रस्ताव शासनाकडे प्रशासकीय मान्यतेसाठी संबंधित महामंडळाने सादर करावा.

७) अशा प्रस्तावांना "४७११- पूर संरक्षक कामे" या लेखाशिर्षाखाली शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक- पुसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिं.व्य.(म), दिनांक ३१.०८.२०१९ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिका-यांची मान्यता घेऊन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात यावी.

**ब) <u>प्रत्यक्ष गाळ काढण्याची कार्यपध्दती</u> :**

१) सदर कामाची प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर नदी पात्रातील गाळ काढण्याची कार्यवाही जलसंपदा विभागांतर्गत यांत्रिकी संघटनेमार्फत हाती घेण्यात यावी. सद्य:स्थितीत जलसंपदा विभागांतर्गत यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध असलेली यंत्रसामुग्री ही जलसंपदा विभागाच्या नियमित कामासाठी आवश्यक असल्यामुळे या धोरणानुसार नदीतील गाळ काढण्याची कार्यवाही यांत्रिकी संघटनेने खालील पर्यायांचा अवलंब करुन करावी :-

(i) <u>यांत्रिकी संघटनेने नवीन यंत्रसामुग्री खरेदी करुन त्याद्वारे गाळ काढणे</u> :-

- नदी पात्रातील गाळ काढण्याची कार्यवाही शासन निर्णयाच्या दिनांकापासून ५ वर्षात टप्प्याटप्प्याने प्राधान्यक्रम ठरवून पूर्ण करावयाची आहे. सदर काम ५ वर्षात पूर्ण करावयाचे असल्यामुळे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेच्या मुख्य अभियंता यांनी त्यासाठी आवश्यक यंत्रसामुग्री खरेदी करण्याची कार्यवाही या शासन निर्णयाच्या दिनांकापासून सहा महिन्यात करावी.
- सदर यंत्रसामुग्रीची खरेदी करण्यासाठी यांत्रिकी संघटनेमार्फत स्वतंत्रपणे प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.
- सदर मशिनरीच्या देखभाल व दुरुस्तीकरीता "मुख्य लेखाशिर्ष ४७०१, ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री " या लेखाशिर्षाखाली तरतूद करण्यात यावी.
- सदर कामासाठी आवश्यक मनुष्यबळ कमी पडत असल्यास प्रचलित पध्दतीनुसार कंत्राटी स्वरुपात मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्यात यावे.

(ii) <u>अशासकीय संस्थेच्या (NGO ) मदतीने गाळ काढणे</u> :-

- सदर काम अधिक जलदगतीने पूर्ण करण्याच्या दृष्टीकोनातून काही ठिकाणी काही अशासकीय संस्थांना (NGO) मदतीला घेण्याचे प्रयत्न करण्यात यावेत. अशा प्रकरणांमध्ये जर अशासकीय संस्था यंत्रसामुग्री (परिचालनासाठी आवश्यक मनुष्यबळासह) तसेच त्यासाठी लागणारे पेट्रोल, तेल, वंगण या

सर्वांची उपलब्धता करुन देत असेल, तर त्यांना तसे काम क्षेत्रिय कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या देखरेखीखाली करण्यास परवानगी देण्यात यावी. जर अशा अशासकीय संस्था केवळ यंत्रसामुग्री व परिचालनासाठी आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन देत असेल, तर त्यासाठी लागणा-या पेट्रोल, तेल, वंगण (POL) जलसंपदा विभागाच्या कार्यकारी अभियंता (यांत्रिकी ) यांचेमार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल व याबाबतचा खर्च "४७११- पूर संरक्षक कामे" या लेखाशिर्षांतर्गत करण्यात यावा. त्यांनी केलेल्या कामांचे प्रमाणपत्र कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांनी त्यांच्या स्तरावर देण्यात यावे.

(iii) <u>खाजगी कंपन्यांकडून Corporate Social Responsibility fund (CSR) अंतर्गत गाळ काढणे</u> :-

- सदर काम अधिक जलदगतीने पुर्ण करण्याच्या दृष्टीकोनातून काही ठिकाणी खाजगी कंपन्यांकडून CSR अंतर्गत अशा कामांसाठी मदत घेण्याचे प्रयत्न करावेत. अशा प्रकरणांमध्ये जर खाजगी कंपनी CSR अंतर्गत यंत्रसामुग्री (परिचालनासाठी आवश्यक मनुष्यबळासह) तसेच त्यासाठी लागणारे पेट्रोल, तेल, वंगण या सर्वांची उपलब्धता करुन देत असेल, तर त्यांना तसे काम क्षेत्रिय कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या देखरेखीखाली करण्यास परवानगी देण्यात यावी. जर अशा खाजगी कंपन्या केवळ यंत्रसामुग्री व परिचालनासाठी आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन देत असेल, तर त्यासाठी लागणा-या पेट्रोल, तेल, वंगण (POL) जलसंपदा विभागाच्या कार्यकारी अभियंता (यांत्रिकी ) यांचेमार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल व याबाबतचा खर्च "४७११- पूर संरक्षक कामे" या लेखाशिर्षांतर्गत करण्यात यावा. त्यांनी केलेल्या कामांचे प्रमाणपत्र कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांनी त्यांच्या स्तरावर देण्यात यावे.

२) उपरोक्त प्रमाणे निश्चित केलेल्या पर्यायास अनुसरुन प्रत्यक्ष गाळ काढण्याची कार्यवाही संबंधित कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांचे देखरेखीखाली करण्यात यावी.

**क) <u>काढलेल्या गाळाची विल्हेवाट लावणेबाबतची कार्यपध्दती</u>:-**

१) जलसंपदा विभागामार्फत फक्त नदी पात्रातून गाळ काढण्याची कार्यवाही अपेक्षित असून त्याची विल्हेवाट/लिलाव/वापर व त्याचा हिशोब याबाबतची कार्यवाही महसूल विभागामार्फत करण्यात येईल.

२) जलसंपदा विभागामार्फत नदी पात्रातील काढलेल्या गाळाचा साठा करण्यासाठी महसूल विभागाने शासकीय अथवा खाजगी जागा मोफत उपलब्ध करुन द्यावी.

३) गाळ काढणेत येणा-या नद्यांमध्ये जर खाजगी बेटे असतील, तर त्याबाबत संबंधीतांची संमती/परवानगी प्राप्त करणेची कार्यवाही महसूल विभागामार्फत करण्यात यावी.

४) काढण्यात येणारा गाळ स्थानिक शेतकरी त्यांच्या शेतामध्ये स्वखर्चाने वाहून नेण्यास तयार असतील, तर त्यांना स्वामित्वधन अदा करण्यापासून सूट देऊन प्राधान्याने शेतक-यांना काढलेला गाळ उपलब्ध करुन देण्यात यावा.

ड) **<u>इतर शर्ती व अटी</u>** :

१) नदीपात्रातील गाळ साठलेल्या भागाची लांबी, गाळाचे परिमाण व खोली निश्चित करणे, कामाचा प्रकल्प अहवाल तयार करणे, अंदाजपत्रक करणे तसेच प्रत्यक्ष काम करुन गाळ निष्कासित करणे व त्याची मोजमापे नोंदविणे यासाठीची मार्गदर्शक तत्त्वे स्वतंत्रपणे जलसंपदा विभागामार्फत निर्गमित करण्यात येतील.

२) काढलेल्या गाळाची विल्हेवाट लावण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठीची मार्गदर्शक तत्वे स्वतंत्रपणे महसूल विभागामार्फत निर्गमित करण्यात येतील.

३) उपरोक्तनुसार नदी पात्रातील गाळ काढण्याचे काम हे पूर संरक्षक काम - अर्थात, पूराचा तडाखा नद्यांच्या तीरावरील नागरी व शहरी भागांना कमी पोहोचावा या हेतूने करण्यात येत असल्यामुळे व यास जिल्हाधिकारी यांचेकडून आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ अंतर्गत ठरावाद्वारे मंजूरी देण्यात येणार असल्यामुळे या कामासाठी इतर कोणत्याही विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र/वैधानिक मान्यता घेण्याची आवश्यकता राहणार नाही.

४) गाळ काढण्याचे काम सागरी किनारी क्षेत्रात (CRZ) येत असल्यास सदर काम हाती घेण्यापूर्वी त्याबाबत सक्षम प्राधिकरणाची मंजूरी घेणे आवश्यक राहील.

५) नदीपात्रातील गाळ काढताना भूजल उत्खनन, स्वच्छ पाणी धारणा पद्धतीचा वापर, पावसाच्या पाण्याचे संवर्धन, पाण्याचा पुर्नभरण, नदीचा किमान प्रवाह राखणे याबाबत काळजी घेण्यात यावी.

६) नदीपात्रातील गाळ काढताना अनाधिकृत वाळू उत्खनन होणार नाही याची खबरदारी घ्यावी.

७) गाळ काढण्यापूर्वी, काढताना / काढून झाल्यावर GIS Based photographs व चित्रफिती जलसंपदा विभागाच्या संकेतस्थळावर अपलोड करण्यात याव्यात.

इ) **<u>नद्यांमध्ये येणारा गाळ कमी प्रमाणात यावा याकरिता आवश्यक दीर्घकालीन उपाययोजना</u>** :

१) नद्यांमध्ये गाळ साठण्याची प्रक्रिया नैसर्गिकपणे अव्याहत सुरु असते. या धोरणानुसार नद्यांमधून गाळ निष्कासित केल्यानंतर नदीच्या तीरावरील नागरी/शहरी भागांना पूराचा तडाखा कमी बसेल व जिवित/वित्त हानी कमी होईल, असे जरी असले तरी नदीत गाळ साठण्याच्या कारणांच्या मुळाशी जाऊन नदी खोरे उपाययोजना करणे अत्यावश्यक आहे , जेणेकरुन नदी पात्रात गाळ साठण्याची प्रक्रिया संथपणे होईल. अन्यथा गाळ निष्कासित केल्यानंतर काही वर्षांमध्ये पुन:श्च नव्याने गाळ साचेल व पुन्हा नदीचे पाणी नदी पात्राबाहेर पसरुन नागरी/शहरी भागाचे नुकसान होऊ शकेल.

२) तसे होणे टाळण्याकरिता पुढीलप्रमाणे उपाययोजना नदीखो-यात राबविण्यात याव्यात. व याकरिता आवश्यक निधी त्या-त्या विभागाने संबंधित कामाशी निगडीत लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

I. नदी खो-यातील तीव्र उतारावरील मातीच्या धुपीच्या तीव्रतेनुसार आणि प्रमाणानुसार छोटे छोटे पाणलोट क्षेत्र निर्धारित करुन मर्यादीत क्षेत्रासाठी मृद आणि जल संधारणाच्या उपाययोजना मृद व जल संधारण विभागाने कराव्यात.

II. वृक्षतोडीवर कायमस्वरुपी बंदी आणून हानी पोहोचलेल्या ठिकाणी जंगल विभागात (Degraded forest) पुनर्लागवड करण्याची कार्यवाही वन विभागाने करावी.

III. नदीच्या दोन्ही बाजूने झाडाची लागवड करावी व नदी काठाची धूप थांबविणे याबाबत उपाययोजना करण्याबाबत महसूल व वन विभागाने कार्यवाही करावी

IV. नदी आणि नाले यांच्या पात्रात पुन्हा गाळ येवू नये यासाठी सर्व संबंधित विभागांनी जैविक व अभियांत्रिकी उपाययोजना कराव्यात.

उपरोक्त सर्व कामांचे संनियंत्रण जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील समितीमार्फत करण्यात यावे.

सदर शासन निर्णय (१) मृद व जलसंधारण विभाग, (२) पर्यावरण विभाग, (३)मदत व पुनर्वसन विभाग, (४) महसूल व वन विभाग, (५) नियोजन विभाग व (६) वित्त विभाग यांचे अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ (१) क्र. ८१/जल-१, दिनांक २०.१०.२०२२, (२) क्र. निरंक /तां.क.-३, दिनांक १०.१०.२०२२,(३) क्र. निरंक/आव्यप्र-१, दिनांक १८.१०.२०२२, (४) क्र. निरंक, दिनांक०७.०९.२०२२ व दिनांक ०४.१०.२०२२,(५) क्र.३०३/१४३३, दिनांक १३.०२.२०२३ व (६)क्र. १२/व्यय-१२,दिनांक २७.०१.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र राज्याच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०७२५१७०४११३३२७ असा देण्यात आला आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

**सहपत्र :- परिशिष्ट-१.**

SANJIV ARUNKANT TATU

Digitally signed by SANJIV ARUNKANT TATU
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CDC760A62A3C19856AA294BBEA7AE1D009186809C9360393D324611015F646EA, cn=SANJIV ARUNKANT TATU
Date: 2023.07.25 18:52:30 +05'30'

**( सं.अ.टाटू )**

**शासनाचे मुख्य अभियंता तथा सहसचिव**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.

७. सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११.सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विकास महामंडळे, जलसंपदा विभाग.
१२.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१३.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१४.सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.

| परिशिष्ट- 1 | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | महामंडळ | जिल्हा | नदीचे नांव | Name of Rivers | प्राथम्याने खोलीकरण करण्याच्या नदीची लांबी ( कि.मी.) |
| 1 | | 2 | 3 | 4 | 5 |
| 1 | मकृखोविम,पुणे | अहमदनगर | सिना | Sina | 2.00 |
| 2 | मकृखोविम,पुणे | अहमदनगर | भिंगरनाला | Bhingarnalla | 2.00 |
| 3 | मकृखोविम,पुणे | अहमदनगर | खैरी | Khairi | 7.00 |
| 4 | मकृखोविम,पुणे | अहमदनगर | विंचारना | Vincharana | 5.00 |
| 5 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | वारणा | Warna | 5.00 |
| 6 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | कडवी | Kadvi | 3.00 |
| 7 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | कासारी | Kasari | 5.00 |
| 8 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | भोगावती | Bhogawati | 5.00 |
| 9 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | पंचगंगा | Panchganga | 15.00 |
| 10 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | हिरण्यशेपी | Hiranyakeshi | 3.00 |
| 11 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | ताम्रपर्णी | Tamraparni | 6.00 |
| 12 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | घटप्रभा | Ghatprabha | 4.00 |
| 13 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | वेदगंगा | Vedganga | 10.00 |
| 14 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | कृष्णा | Krishna | 3.40 |
| 15 | मकृखोविम,पुणे | कोल्हापूर | जांभळी | Jambhali | 2.00 |
| 16 | मकृखोविम,पुणे | पुणे | मुठा | Mutha | 23.00 |
| 17 | मकृखोविम,पुणे | पुणे | मुळा-मुठा | Mula-Mutha | 61.00 |
| 18 | मकृखोविम,पुणे | पुणे | मुळा | Mula | 5.00 |
| 19 | मकृखोविम,पुणे | पुणे | भीमा | Bhima | 5.00 |
| 20 | मकृखोविम,पुणे | पुणे | राम | Ram | 15.00 |
| 21 | मकृखोविम,पुणे | पुणे | उरवाडे नाला | Urawade Nalla | 13.26 |
| 22 | मकृखोविम,पुणे | पुणे | सुधा | Sudha | 5.00 |
| 23 | मकृखोविम,पुणे | पुणे | कासारसाई नाला | Kasarsai Nalla | 9.40 |
| 24 | मकृखोविम,पुणे | पुणे | घोड | Ghod | 10.00 |
| 25 | मकृखोविम,पुणे | पुणे | कुकडी | Kukadi | 10.00 |
| 26 | मकृखोविम,पुणे | पुणे | घोड (मिना) | Ghod (Mina) | 10.00 |
| 27 | मकृखोविम,पुणे | पुणे | कुकडी (मांडवी) | Kukadi (Mandvi) | 5.00 |
| 28 | मकृखोविम,पुणे | पुणे | कुकडी (पुष्पवती) | Kukadi (Pushpavati) | 3.00 |
| 29 | मकृखोविम,पुणे | सांगली | कृष्णा | Krishna | 20.00 |
| 30 | मकृखोविम,पुणे | सांगली | वारणा | Warna | 10.00 |
| 31 | मकृखोविम,पुणे | सातारा | कृष्णा | Krishna | 10.00 |
| 32 | मकृखोविम,पुणे | सातारा | कोयना | Koyna | 10.00 |
| 33 | मकृखोविम,पुणे | सातारा | कृष्णा | Krishna | 5.00 |
| 34 | मकृखोविम,पुणे | सोलापूर | भीमा | Bhima | 25.00 |
| 35 | मकृखोविम,पुणे | सोलापूर | माण | Man | 5.00 |
| 36 | मकृखोविम,पुणे | सोलापूर | कोरडा | Korda | 5.00 |
| 37 | कोपाविम,ठाणे | ठाणे | पेज | Pej | 5.00 |
| 38 | कोपाविम,ठाणे | ठाणे | शिलार | Shilar | 5.00 |
| 39 | कोपाविम,ठाणे | ठाणे | पोशिर | Poshir | 5.00 |
| 40 | कोपाविम,ठाणे | ठाणे | मुरबाडी | Murbadi | 5.00 |
| 41 | कोपाविम,ठाणे | ठाणे | काळू | Kalu | 10.00 |
| 42 | कोपाविम,ठाणे | ठाणे | कनकविरा | Kanakvira | 5.00 |
| 43 | कोपाविम,ठाणे | ठाणे | शाई | Shai | 5.00 |
| 44 | कोपाविम,ठाणे | ठाणे | कानवी | Kanvi | 5.00 |
| 45 | कोपाविम,ठाणे | ठाणे | उल्हास | Ulhas | 10.00 |
| 46 | कोपाविम,ठाणे | पालघर | सुर्या | Surya | 48.00 |
| 47 | कोपाविम,ठाणे | पालघर | वांद्री | Wandri | 10.00 |
| 48 | कोपाविम,ठाणे | पालघर | देहरजी | Deharji | 34.00 |
| 49 | कोपाविम,ठाणे | पालघर | गारगाई | Gargai | 22.00 |
| 50 | कोपाविम,ठाणे | पालघर | पिंजाळ | Pinjal | 35.00 |

| अ.क्र. | महामंडळ | जिल्हा | नदीचे नांव | Name of Rivers | प्राथम्याने खोलीकरण करण्याच्या नदीची लांबी ( कि.मी.) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | | 2 | 3 | 4 | 5 |
| 51 | कोपाविम,ठाणे | पालघर | तानसा | Tansa | 56.00 |
| 52 | कोपाविम,ठाणे | पालघर | वैतरणा | Vaitarna | 84.40 |
| 53 | कोपाविम,ठाणे | रत्नागिरी | अर्जुना | Arjuna | 5.00 |
| 54 | कोपाविम,ठाणे | रत्नागिरी | जगबूडी | Jagbudi | 5.00 |
| 55 | कोपाविम,ठाणे | रत्नागिरी | वाशिष्ठी | Vashisthi | 10.00 |
| 56 | कोपाविम,ठाणे | रत्नागिरी | काजळी | Kajli | 5.00 |
| 57 | कोपाविम,ठाणे | रत्नागिरी | शास्त्री | Shastri | 5.00 |
| 58 | कोपाविम,ठाणे | रत्नागिरी | सोनवी | Sonvi | 4.00 |
| 59 | कोपाविम,ठाणे | रायगड | म्हसळा | Mhasal | 22.00 |
| 60 | कोपाविम,ठाणे | रायगड | सावित्री | Savitri | 14.00 |
| 61 | कोपाविम,ठाणे | रायगड | कुंडलिका | Kundalika | 12.00 |
| 62 | कोपाविम,ठाणे | रायगड | अंबा | Amba | 8.00 |
| 63 | कोपाविम,ठाणे | रायगड | बाळगंगा | Balganga | 5.00 |
| 64 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | वाघोटन | Vaghotan | 5.00 |
| 65 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | देवगड | Devgad | 5.00 |
| 66 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | गड | Gad | 5.00 |
| 67 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | कर्ली | Karli | 5.00 |
| 68 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | आचरा | Achara | 3.00 |
| 69 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | तेरेखोल | Terekhol | 5.00 |
| 70 | कोपाविम,ठाणे | सिंधुदुर्ग | तिलारी | Tilari | 5.00 |
| 71 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | उस्मानाबाद | तेरणा | Terna | 5.00 |
| 72 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | उस्मानाबाद | मांजरा | Manjara | 15.00 |
| 73 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | उस्मानाबाद | बोरी | Bori | 10.00 |
| 74 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | औरंगाबाद | शिवना | Shivana | 5.00 |
| 75 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | औरंगाबाद | बोर | Bor | 5.00 |
| 76 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | औरंगाबाद | खाम | Kham | 10.00 |
| 77 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | औरंगाबाद | गोदावरी | Godavari | 20.00 |
| 78 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | जालना | पाथरवाळा नदी | Patharawala River | 2.16 |
| 79 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | जालना | जोगालादवी नदी | Jogaladavi River | 2.15 |
| 80 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | जालना | शाहा नदी | Shaha River | 2.11 |
| 81 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | जालना | रामासगाव नदी | Ramasgav River | 2.10 |
| 82 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | नांदेड | गोदावरी | Godavari | 15.00 |
| 83 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | नाशिक | कडवा नदी | Kadwa River | 41.40 |
| 84 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | नाशिक | पाराशा नदी | Parasha River | 23.10 |
| 85 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | नाशिक | कोळवण नदी | Kolvan River | 20.50 |
| 86 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | नाशिक | उनांदा ( ओझरखेड धरण ते कडवा नदी ) | Unanda (Ozer khad Dam To Kadawa River) | 7.50 |
| 87 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | नाशिक | उनांदा ( पूणे गोम धरण ते ओझरखेड डॅम ) | Unanda (Pune goan dam to Ozer khad Dam.) | 8.60 |
| 88 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | परभणी | दुधना | Dudhana | 15.00 |
| 89 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | परभणी | मासोळी | Masoli | 4.00 |
| 90 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | परभणी | कारपारा | Karpara | 6.00 |
| 91 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | लातूर | रेणा | Rena | 15.00 |
| 92 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | लातूर | मांजरा | Manjara | 25.00 |
| 93 | गोमपाविम,छ.संभाजीनगर | हिंगोली | कायधु नदी | Kaydhu River | 45.00 |
| 94 | विपाविम,नागपूर | अकोला | वाण | Wan | 5.00 |
| 95 | विपाविम,नागपूर | अकोला | मोर्णा | Morna | 12.00 |
| 96 | विपाविम,नागपूर | अकोला | विद्रुपा | Vidrupa | 8.00 |
| 97 | विपाविम,नागपूर | अमरावती | अंबा | Amba | 10.00 |
| 98 | विपाविम,नागपूर | अमरावती | बिच्छन | Vichhan | 7.00 |
| 99 | विपाविम,नागपूर | अमरावती | सपन | Sapan | 7.00 |
| 100 | विपाविम,नागपूर | अमरावती | शानूर | Shanur | 5.00 |
| 101 | विपाविम,नागपूर | अमरावती | चंद्रभागा | Chandrabhaga | 5.00 |

| अ.क्र. | महामंडळ | जिल्हा | नदीचे नांव | Name of Rivers | प्राथम्याने खोलीकरण करण्याच्या नदीची लांबी ( कि.मी.) |
|---|---|---|---|---|---|
| **1** | | **2** | **3** | **4** | **5** |
| 102 | विपाविम,नागपूर | अमरावती | नाल | Nal | 2.00 |
| 103 | विपाविम,नागपूर | अमरावती | देवाना | Devana | 5.00 |
| 104 | विपाविम,नागपूर | अमरावती | जिवाना | Jiwana | 5.00 |
| 105 | विपाविम,नागपूर | अमरावती | वर्धा | Vardha | 19.70 |
| 106 | विपाविम,नागपूर | अमरावती | पुर्णा | Poorna | 70.00 |
| 107 | विपाविम,नागपूर | गडचिरोली | पोटफोडी | Potphodi | 5.00 |
| 108 | विपाविम,नागपूर | गडचिरोली | साती | Sati | 7.00 |
| 109 | विपाविम,नागपूर | गडचिरोली | प्राणहिता | Pranhita | 10.00 |
| 110 | विपाविम,नागपूर | गोंदिया | वैनगंगा | Vainganga | 18.00 |
| 111 | विपाविम,नागपूर | गोंदिया | चूलबंद | Chulband | 7.00 |
| 112 | विपाविम,नागपूर | गोंदिया | गाढवी | Gadhavi | 10.00 |
| 113 | विपाविम,नागपूर | चंद्रपूर | पैनगंगा | Painganga | 20.00 |
| 114 | विपाविम,नागपूर | चंद्रपूर | वर्धा | Wardha | 30.00 |
| 115 | विपाविम,नागपूर | नागपूर | कनान | Kanan | 5.00 |
| 116 | विपाविम,नागपूर | नागपूर | वेन्ना | Venna | 5.00 |
| 117 | विपाविम,नागपूर | नागपूर | नंद | Nand | 5.00 |
| 118 | विपाविम,नागपूर | नागपूर | नाग | Nag | 3.55 |
| 119 | विपाविम,नागपूर | नागपूर | जाम | Jam | 10.00 |
| 120 | विपाविम,नागपूर | बुलढाणा | मून | Mun | 20.00 |
| 121 | विपाविम,नागपूर | बुलढाणा | तोरणा | Torna | 10.00 |
| 122 | विपाविम,नागपूर | बुलढाणा | पैनगंगा | Painganga | 20.00 |
| 123 | विपाविम,नागपूर | भंडारा | वैनगंगा | Vainganga | 5.00 |
| 124 | विपाविम,नागपूर | भंडारा | सूर | Sur | 5.00 |
| 125 | विपाविम,नागपूर | भंडारा | चूलबंद | Chulband | 10.00 |
| 126 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | बेंबाळा | Bembala | 17.50 |
| 127 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | अरुणावती | Arunawati | 15.00 |
| 128 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | अदान | Adan | 10.00 |
| 129 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | खुनी | Khuni | 7.00 |
| 130 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | गोकी | Goki | 5.00 |
| 131 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | चक्रवती | Chakravati | 5.00 |
| 132 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | पूस | Pus | 5.00 |
| 133 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | वाघाड | Waghad | 5.00 |
| 134 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | निरगुडा | Nirguda | 5.00 |
| 135 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | खडकपूर्णा | Khadakpurna | 10.00 |
| 136 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | उतावळी | Utawali | 5.00 |
| 137 | विपाविम,नागपूर | यवतमाळ | सिध्दगंगा | Sidhhaganga | 0.00 |
| 138 | विपाविम,नागपूर | वर्धा | बोर | Bor | 10.00 |
| 139 | विपाविम,नागपूर | वर्धा | पंचधारा | Panchdhara | 7.00 |
| 140 | विपाविम,नागपूर | वर्धा | धाम | Dham | 10.00 |
| 141 | विपाविम,नागपूर | वर्धा | पोथारा | Pothara | 5.00 |
| 142 | विपाविम,नागपूर | वर्धा | कार | Kar | 2.00 |
| | | | | **Total** | **1608.83** |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |